प्रथम वर्ग अधिका-यांच्या बृहन्मुंबईतील
शासकीय निवासस्थान वाटपासंबंधीचे नियम.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-शानिवा-१५९१/प्र. क्र. १०७४/२३-अ
९१

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक- २० सप्टेंबर, १९९१.

शासन निर्णय:-

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसीडी-१५८९/२३-अ, दिनांक २० ऑक्टोबर, १९९१ अन्वये प्रथम वर्ग अधिका-यांनी त्यांना वाटप केलेले नियमित शासकीय निवासस्थान नाकारल्यास प्रतिक्षायादीवरील त्यांचा क्रम सहा महिन्यापर्यन्त खाली आणण्यात येत असे. वाटप केलेले निवासस्थान या ना त्या कारणाने नाकारण्याचे प्रमाण वाढले असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले असल्यामुळे शासनाने असा निर्णय घेतला आहे की, प्रथमवर्ग अधिका-यांनी त्यांना वाटप केलेले बृहन्मुंबईतील नियमित शासकीय निवासस्थान नाकारल्यास त्यांचा निवासस्थानाच्या प्रतिक्षा यादीतील क्रम एक वर्षापर्यन्त खाली आणण्यात यावा. या निर्णयानुसार वाटप आदेशासोबतच्या जोडपत्र "ब" मधील अट क्र. [३][ब] बदलण्यात यावी.

हे आदेश दिनांक १ सप्टेंबर, १९९१ पासून अंमलात आणण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ अ. व. आम्बेरकर ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
अधिक्षक अभियंता, मुंबई, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई,
कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर विभाग, केंद्रिय तारघरासमोर, जुनी सार्वजनिक बांधकाम इमारत, मुंबई-४०० ००१,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, उत्तर मुंबई विभाग, भवन्स कॉलेजजवळ, अंधेरी[पश्चिम], मुंबई-४०० ०५८.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मध्यमुंबई विभाग, वरळी, मुंबई-४०० ०१८
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्यायशाखा, मुंबई[पत्राने],
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई[पत्राने],
प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय[पत्राने],
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग[पत्राने]

सार्वजनिक बांधकाम विभाग,

इतर सर्व मंत्रालयीन विभाग,

बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख

निवड नस्ती.